**नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा मुंबई तसेच ठाणे शिधावाटप क्षेत्र यांच्या कार्यालयातील वाहन चालक (वर्ग-३) ची पदे मे.क्रिष्णा मोटर्स, मुंबई या बाहययंत्रणेकडून उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या सेवेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. वाहन - २०१८/प्र.क्र.१५१/ना.पु.१५**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार) मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ९ जानेवारी, २०२०.

वाचा:-१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पदनि-२०१०/प्र.क्र.८४/१०/विसु-१, दि. २/८/२०१६.
२) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र.काआआ-२०१३/प्र.क्र.२३३/काम-८, दि. १८/६/२०१४.
३) शासनपत्र उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र.काआआ-२०१३/प्र.क्र.२३३/काम-८, दि. २६/११/२०१८
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पदनि-२०१०/प्र.क्र.८४/१०/विसु-१, दि. २७/९/२०१०.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पदनि-२०१३/प्र.क्र.११/१३/विसु-१, दि. २/२/२०१३.
६) शासनपत्र क्र.वाहन-२०१८/प्र.क्र.१५१/ना.पु.१५, दि. २९ सप्टेंबर, २०१८.
७) नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांचे पत्र क्र.निशि/आस्था/ २०१८/९अ/ जा.६८, दि. ५/२/२०१८.
८) नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांचे पत्र क्र.निशि/आस्था/ २०१८/ ९अ/ जा.५४, दि. ७/८/२०१९

प्रस्तावना:-

नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांच्या कार्यालयातील तसेच ठाणे शिधावाटप क्षेत्र या अधिनस्त कार्यालयांकरिता राज्य स्तरीय पथकास संपूर्ण महाराष्ट्रात जीवनावश्यक वस्तु कायदयांतर्गत विविध कायदयांचा भंग होत असल्याची प्रकरणे शोधण्याकरिता अचानक धाडी टाकणे, विविध परवान्याची तपासणी करणे, पेट्रोलियम पदार्थांच्या भेसळीची प्रकरणे शोधून काढून गुन्हे दाखल करण्याकरीता वाहनांची व पर्यायाने वाहनचालकांची आवश्यकता असल्याने नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई व त्यांच्या अधिनस्त कार्यालयातील वाहनचालकांची पदे भरण्यास संदर्भ क्र. ६ च्या शासनपत्रानुसार मान्यता देण्यात आली आहे.

सदरची रिक्त पदे उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या संदर्भ क्र. २ व ३ अन्वये तसेच वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ४ व ५ अन्वये दिलेल्या मार्गदर्शक सुचनेनुसार बाहय यंत्रणेमार्फत मनुष्यबळ पुरविण्यात येणा-या एजन्सीकडून भरण्याबाबत संदर्भ क्र. ६ च्या पत्रान्वये नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांना कळविण्यात आले होते.

त्यानुसार उपरोक्त कार्यालयातील रिक्त असलेली वर्ग-३ ची ५ पदे बाहययंत्रणेमार्फत भरण्यासाठी नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांनी संदर्भ क्र.८ च्या पत्रानुसार मे. क्रिष्णा मोटर्स, मुंबई या निविदाकारांच्या पॅनलची निवड करुन दिनांक ६/८/२०१९ ते दिनांक ६/८/२०२१ या दोन वर्षाच्या कालावधीसाठी या उपरोक्त एजन्सीबरोबर करारनामा केला आहे. सदर एजन्सीने उपलब्ध करुन दिलेल्या वरील पदांना वेतन अदा करण्यासाठी येणा-या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई व ठाणे शिधावाटप क्षेत्र कार्यालये व त्यांची अधिनस्त कार्यालये यांच्याकरिता वाहनचालकांच्या रिक्त असलेल्या ५ पदांपैकी ३ वाहनचालकांचे मनुष्यबळ मासिक दरावर मे.क्रिष्णा मोटर्स, मुंबई या एजन्सीकडून दिनांक ६/८/२०१९ ते दिनांक ६/८/२०२१ या दोन वर्षाच्या कालावधीसाठी उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

**वाहनचालकाचे दर**

| प्रति वाहनचालक प्रतिमाह दर | अतिकालिक भत्ता | |
|---|---|---|
| | मुंबईमध्ये | मुंबईबाहेर |
| रु. १५,०२५/- | रु.४०/- प्रतितास +रात्री १० नंतर कामासाठी थांबावे लागल्यास जेवण भत्ता रु. १५०/- व रात्री ११ नंतर कामासाठी थांबावे लागल्यास प्रवास भत्ता | मुंबईबाहेरील भत्ता रु. ३००/- (रु.४०/-प्रतितास नियमानुसार) |

२. सदर एजन्सीने उपलब्ध करुन दिलेल्या मनुष्यबळांच्या वेतनापोटी येणा-या खर्चास संदर्भ क्र. ५ अन्वये बाहय यंत्रणेद्वारे कामे करुन घेण्याबाबत देण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार, नियमित पध्दतीने पदे भरण्यामुळे होणाऱ्या खर्चाच्या तुलनेत बाहय यंत्रणेद्वारे सेवा घेतांना होणाऱ्या खर्चात १०% ते २५% बचत होईल या अटीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरचा शासन निर्णय हा शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७/४/२०१५ मधील, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका -१९७८ भाग पहिला, उपविभाग-चार खर्चाच्या संकीर्ण बाबीमधील अ.क्र.११ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर कर्मचा-यांच्या वेतनावर होणारा खर्च मागणी क्र. एम २ मुख्य लेखाशीर्ष " २४०८-अन्न साठवण व वखार साठवण (०१) अन्न १०१ प्रापण आणि पुरवठा (०२)(००) शिधावाटप (०२)(०१) मुंबई शिधावाटप क्षेत्र दत्तमत २४०८ ००६४ १३ कार्यालयीन खर्च " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सदर खर्च वित्तीय वर्ष २०१९-२०२० करिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच त्यापुढील खर्च सदर लेखाशीर्षातील त्या त्या वर्षी मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२००१०९१७०६०२४५०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manojkumar Manikrao Suryawanshi

Digitally signed by Manojkumar Manikrao Suryawanshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supply and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7f01fe9e39ec840cfd8aff420acfb85645316150fbe47d78667d211a870b6cad, serialNumber=171d531e2df977f0515a96704f71cb7e1b7622eae8ceb5547f27f39b9cdd96b0, cn=Manojkumar Manikrao Suryawanshi
Date: 2020.01.20 14:59:50 +05'30'

**( मनोजकुमार सुर्यवंशी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत ,**

१) मा. प्रधान सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक.
२) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
३) महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
८) कक्ष अधिकारी / (विनियम) वित्त विभाग.
९) निवडनस्ती-ना.पु.१५.